महाराष्ट्र राज्य विधी आयोग बरखास्त करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

विधी व न्याय विभाग,
शासन निर्णय क्र. मविआ-१००८/३४३/प्र.क्र.६२/का-१९
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय,
मुंबई - ४०० ०३२, दि. १२ ऑक्टोबर, २०११.

**पहा :-** १) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.एलसी १०९३/५६६/(१२२)/१९. दि.३०.९.१९९६
२) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.मविआ १४००/प्र.क्र.३९/का-१९, दि.२१.१२.२००१
३) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र. मविआ १४००/(प्र.क्र.८२)/का-१९.
दि.१४.१० २००२.
४) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.मविआ १००६/१८९/(७/२००६)/का-१९.
दि.२.११.२००६.
५) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.मविआ २००७/२५१/(४९/२००७)/का-१९.
दि.५.१०.२००७.

**प्रस्तावना :-** समाजाच्या बदलत्या गरजांची पूर्तता, नवीन कायद्यांची निर्मिती व प्रचलित कायद्यांमध्ये बदलत्या परिस्थितीचा विचार करुन योग्य त्या सुधारणा शासनास सुचवून त्याचा दर्जा सुधारण्यासाठी शासनाने दिनांक ३०.९.१९९६ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य विधी आयोगाची स्थापना केलेली आहे. उक्त नंतर शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य विधी आयोगाची मुदत वेळोवेळी वाढविण्यात आली आहे. या विभागाच्या दिनांक ५.१०.२००७ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य विधी आयोगास दिनांक ३०.९.२००८ पर्यंत मुदत देण्यात आली होती. सदर मुदत संपल्यानंतर या विभागाने आयोगाचे पुर्नगठन करणेसंबंधीचा प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला असता, तत्कालीन मा.मुख्यमंत्री महोदयांनी विधी आयोगाचे पुर्नगठन होईपर्यंत, सध्याच्या आयोगास मुदतवाढ दयावी असे आदेश दिले होते. सध्याचे महाराष्ट्र राज्य विधी आयोग बरखास्त करावे अथवा त्याचे पुर्नगठन करावे या संबंधीचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. प्रस्ताव शासनास पुर्नःसादर केला असता शासनाने सध्याचा आयोग बरखास्त करावा व पारदर्शक प्रक्रियेमार्फत नवीन आयोग तातडीने स्थापन करावा असा निर्णय घेतला.

**शासन निर्णय :-** महाराष्ट्र राज्य विधी आयोग या शासन निर्णयान्वये दिनांक १३/१०/२०११ पासून बरखास्त करण्यात येत आहे. नवीन आयोग स्थापन करण्याबाबत आवश्यक कार्यवाही सुरु करण्यात येईल. महाराष्ट्र राज्य विधी आयोगाच्या वापरात असलेले साहित्य तसेच आयोगाच्या कार्यालयाचा ताबा तात्काळ शासनाकडे देण्यात येईल. आयोगातील कर्मचारी वृंदाची पदे ही कंत्राटी पध्दतीने ठराविक कालावधीसाठी भरण्यात आलेली असल्यामुळे आयोगाच्या बरखास्ती बरोबरच आयोगातील कर्मचाऱ्यांच्या सेवा संपुष्टात येतील. आयोगाचे अध्यक्ष, सदस्य व कर्मचारी यांचे दि.१२.१०.२०११ पर्यंतचे वेतन पूर्वी निश्चित केल्यानुसार देण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(विजय आचलिया)
प्रधान सचिव व विधी परामर्शी.

प्रति,
मा.राज्यपालांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मलबार हिल, मुंबई

मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य विधी आयोग, शासकीय कुर्टार क्र.१३, फ्री प्रेस जर्नल मार्ग, मुंबई-२१.
प्रबंधक, मुळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
प्रबंधक, अपिल शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई (२प्रती)
संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,(२प्रती)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
वित्त विभाग व्यय-६, मंत्रालय, मुंबई-३२.
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती.